पोलीस भरती पूर्व प्रशिक्षण योजना.
सन २०११-१२ साठी निधी वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन निर्णय, क्रमांक :पोभप्र-२०११/प्र.क्र.९३/११/का.९
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १८.१०.२०११.

संदर्भ :- (१) शासन निर्णय,अल्पसंख्यांक विकास विभाग क्र.अविवि-२००९/प्र.क्र. १८८/०९/का-१, दि.२७ जुलै, २००९,
(२) शासन निर्णय,अल्पसंख्यांक विकास विभाग क्र.अविवि-२००९/प्र.क्र. १८८/०९/का-१, दि.२७ ऑगस्ट, २००९,
(३) शासन निर्णय,अल्पसंख्यांक विकास विभाग क्र.अविवि २०१०/प्र.क्र.८५/ १०/का.९, दि.३१.१२.२०१०.
(४) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२००९/प्र.क्र.१७/ ०९/का-९, दि.५.१.२०११.
(५) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि २०१०/प्र.क्र.८५/ १०/का-९, दि.१०.१.२०११.
(६) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग यांचे पत्र क्र.राअआ/अर्थ. निधी/२०१०-११/२२२७०, दि.२२.९.२०११.
(७) शासन परिपत्रक क्रमांक:अंदाज-२०.११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दि.२१ सप्टेंबर, २०११.

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांसाठी सुधारित पोलिस शिपाई भरती पूर्व परीक्षा प्रशिक्षण वर्ग योजना वरील संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये कार्यान्वित केली आहे. वरील संदर्भ क्र.२, ३, ४ व ५ येथील निर्णयान्वये सदरहू शासन निर्णय सुधारित करण्यात आला आहे.

२. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाकडून राबविण्यात येत असलेल्या योजनांसाठी सन २०११-१२ करिता मागणी क्रमांक २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८, ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशीर्षाखाली रु:३.०० कोटी एवढी तरतूद करण्यात आली आहे.

३. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने दि.२२.९.२०११ रोजीच्या प्रस्तावाद्वारे केलेल्या मागणीनुसार सन २०११-१२ साठी पोलीस शिपाई भरती पूर्व प्रशिक्षण योजनेकरिता उपरोक्त लेखाशीर्षाखाली महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास रु.१.०० कोटी (रुपये एक कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहेत.

४. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांना उपरोक्त योजनांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असलेल्या निधीसाठी ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सर्व जिल्हाधिकारी तसेच महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ यांना वितरीत करण्यात आलेल्या

रकमेबाबत खर्चाचा तपशिल व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilaization Certificate) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने शासनास विहित कालावधीत सादर करावे. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उप विभाग एक मधील अ.क्र. २७ नियम क्र.१४९ नुसार सर्व अटी व शर्तीचे पालन करुन प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७०२/११/व्यय-४, दि.३.१०.२०११ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१११०१८१५३३५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( व्यंकटेश भट )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
अपर मुख्य सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
पोलीस महासंचालक, मुंबई,
पोलीस आयुक्त (सर्व)
विशेष पोलीस महानिरीक्षक (सर्व)
जिल्हा पोलीस महानिरीक्षक (सर्व)
संचालक, लेखा व कोषागारे
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग, मुंबई,
व्यवस्थापक, महाराष्ट्र माजी सैनिक कल्याण महामंडळ, "रायगड", २ मजला, घोरपडी,पुणे,
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
सर्व मंत्रालयीन विभाग
उप सचिव, वित्त विभाग (व्यय-४), अर्थ-१४ नियोजन विभाग (का-१४७५) मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती (कार्यासन-९)